केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत कार्यक्रमांसाठी सामाजिक विशेष घटकाकरीता (SCSP) सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामधील राज्य हिश्श्यापोटी लेखाशिर्ष २२१०G६०९ अंतर्गत Kind Grant साठी रु.६५१.८५ लक्ष इतका निधी वितरीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बियुडी-१३२३/प्र.क्र.२७२/आरोग्य-७

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : १५ मार्च, २०२४.

<u>वाचा :-</u>

१) भारत सरकार, वित्त मंत्रालय, नवी दिल्ली यांचे मंजूरी आदेश दिनांक १३/०६/२०१९, १६/०२/२०२३, १६/०६/२०२३, ०७/०७/२०२३, ०४/०८/२०२३ व १०/०८/२०२३.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२. ०४. २०२३.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.संकीर्ण-२०१८/प्र.क्र.४६/अर्थोपाय, दिनांक ०५. १२. २०२३.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०८.१२. २०२३.
५) शासन परिपत्रक, क्रमांक:विघयो-२०२४/प्र.क्र.६१/अर्थसंकल्प, दिनांक १२.०३.२०२४
६) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्र.राआसोम/एफएमजी/Kind राहि/१४४५८०-५४५/२०२३-२४ दिनांक १३.०३.२०२४.

<u>प्रस्तावना :-</u>

ग्रामीण जनतेस सहजसाध्य, परवडण्याजोगी, कार्यक्षम, उत्तरायी आणि विश्वासार्ह, सर्व प्रकारच्या गरजूंना आरोग्य सेवा उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने केंद्र शासनाने संपूर्ण देशात एप्रिल २००५ पासून राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान सुरु केले. सन २०१४-१५ मध्ये केंद्र शासनाने आरोग्य विषयक सर्व केंद्र पुरस्कृत योजना एकत्रित करुन त्यास "राष्ट्रीय आरोग्य अभियान" असे नाव दिले. या राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत आता राष्ट्रीय आरोग्य अभियान, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान व राष्ट्रीय रोग नियंत्रण कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत योजनांचा समावेश केला आहे. दरम्यानच्या कालावधीमध्ये संदर्भ (क्र.४) व (क्र.५) येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये केंद्र पुरस्कृत योजनांसाठी करण्यात आलेली मुळ अर्थसंकल्पीय तरतुद व पुरवणी मागणीद्वारे करण्यात आलेली अर्थसंकल्पीय तरतुद केंद्र हिस्सा व समरुप राज्य हिस्सा सर्व मंत्रालयीन विभागानां बीम्स प्रणालीवर १०० टक्के वितरित केलेला असल्याने सदर परिपत्रकांती सुचनांचे पालन करुन निधी आहरित

करण्याची कार्यवाही करण्याबाबत वित्त विभागाने मान्यता दिलेली आहे. तसेच संदर्भ क्र.५ येथील सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या शासन परिपत्रकातील मान्यतेच्या अनुषंगाने राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानाकरीता सामाजिक घटकासाठी (SCSP) निधी सन २०२३-२४ च्या मंजूर अर्थसंकल्पीत तरतुदीतून २२१०G६०९ या लेखाशिर्षाखाली राज्य Kind Grant साठी रु. ६५१.८५ लक्ष इतका निधी राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. प्रस्तुत प्रकरणी आता पर्यंत वितरीत करण्यात आलेल्या अनुदानाचा तपशील पुढील प्रमाणे आहे. :-

(रु. लाखात)

| अ.क्र. | तपशील | (राज्य) २२१०G६०९ |
| --- | --- | --- |
| | | ३१ |
| १ | अर्थसंकल्पीय तरतुद | १४७८८.०६ |
| २ | पावसाळी अधिवेशनात अर्थसंकल्पित तरतूद | ५.२८ |
| ३ | हिवाळी अधिवेशनात अर्थसंकल्पित तरतूद | ४९५६.७३ |
| ४ | अर्थसंकल्पीय अधिवेशनातील तरतूद | १०३५२.७७ |
| A | एकूण तरतूद | ३०१०२.८४ |

| | | |
| --- | --- | --- |
| | शासन निर्णयानुसार प्राप्त अनुदान | |
| १ | बियुडी-१३२३/प्र.क्र.२७२/आरोग्य-७ दि.१७.०७.२३ | ५६५०.०० |
| २ | बियुडी-१३२३/प्र.क्र.२७२/आरोग्य-७ दि.१३.११.२३ | ३२१६.८३ |
| ३ | बियुडी-१३२३/प्र.क्र.२७०/आरोग्य-७ दि.२३.०६.२३ | १०९७.०७ |
| ४ | बियुडी-१३२३/प्र.क्र.२७२/आरोग्य-७ दि.१२.१०.२३ | ५.२८ |
| ५ | बियुडी-१३२३/प्र.क्र.२७२/आरोग्य-७ दि.१२.१०.२३ | ५६७.९१ |
| ६ | बियुडी-१३२३/प्र.क्र.२७२/आरोग्य-७ दि.१२.१०.२३ | ३८५९.६५ |
| ७. | बियुडी-१३२३/प्र.क्र.६४०/आरोग्य-७ दि.०२.०१.२४ | १८३७.६५ |
| ८. | बियुडी-१३२३/प्र.क्र.२७२/आरोग्य-७ दि.०५.०१.२४ | ३९६.६० |
| ९. | बियुडी-१३२३/प्र.क्र.२७२/आरोग्य-७ दि.०२.०१.२४ | २४३३.१७ |
| १०. | पुरमा-३५२३/प्र.क्र.५२४/आरोग्य-७ दि.२४.०१.२४ | ६८५.९१ |
| B | एकूण शासन निर्णयानुसार प्राप्त अनुदान | १९७५०.०७ |
| | शासन निर्णय निर्गमित | |
| D | एकूण प्रस्ताव सादर | |
| १ | शासन निर्णय क्रमांक : बियुडी-१३२४/प्र.क्र.१२४/आरोग्य-७ | २०१५.६८ |
| E | उपलब्ध तरतूद एकूण (A-B-C) | ८३३७.०९ |

**शासन निर्णय :-**

उपरोक्त वाचा मधील क्र. ६ येथील पत्रान्वये संचालक, वित्त व लेखा, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी सन २०२३-२४ मधील तरतुदीतुन राज्य हिश्श्यापोटी २२१०G६०९ या लेखाशिर्षाखाली Kind Grant साठी रु.६५१.८५ लक्ष एवढा निधी वितरणाचा प्रस्ताव सादर केला आहे. त्यास अनुसरुन रु.६५१.८५ लक्ष इतके अनुदान राज्य आरोग्य सोसायटीस वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर निधी वितरणाचा तपशील पुढीलप्रमाणे आहे:-

**(रु. लाखात)**

| .क्र | तपशिल | राज्य हिस्सा | | |
|---|---|---|---|---|
| | | लेखाशिर्ष | सुधारित अंदाजपत्रकीय तरतूद | मागणी रक्कम (राज्य हिस्सा ४०% ) |
| | मागणी क्रं.एन-३, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६ सार्वजनिक आरोग्य,७८९, अनुसूचित जाती उपयोजना, (०१) अनुसूचित जाती घटक (०१)(०६) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान (राज्य हिस्सा ४० टक्के) कार्यक्रम, ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | २२१०G६०९ | ३०१०२.८४ | ६५१.८५ |

२. सदरचा खर्च लेखाशिर्ष २२१०G६०९ अंतर्गत सन २०२३-२४ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्या लेखाशिर्षाखाली खर्ची दाखविण्यात यावा.

३. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करुन विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटीच्या यांच्याकडे सूपुर्द करावी. यासाठी सहसंचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. तसेच सदर निधीच्या विनियोगाबाबत व त्यावरील संनियंत्रण व प्रगती अहवालाच्या अनुषंगाने केंद्र शासनाच्या संदर्भ क्र १ मधील पत्रान्वये दिलेल्या निर्देशाचे पालन करणे बंधनकारक राहील.

०५. वित्त विभागाच्या दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तींची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख / संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

०६. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीच्या लेखा परिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप नसल्याचे राज्य आरोग्य सोसायटीने प्रमाणित केलेले आहे.

०७. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी परिच्छेद-४ मधील संस्थामार्फत पुरवठादाराच्या/लाभार्थ्यांच्या खात्यात थेट जमा होणार आहे.

०८. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तीचे पालन झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

०९. सदर अनुदान सशर्त असून या पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानाचे प्रमाणपत्र सादर केले आहे. वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

१०. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक २४.०६.२०२१ व दिनांक १४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे/ अटी व शर्तीचे पालन करुन त्यासंदर्भात आवश्यक ते प्रमाणपत्र सादर करणे अथवा आवश्यक त्या बाबी स्वतंत्रपणे प्रमाणित करणे राज्य आरोग्य सोसायटीस अथवा सदरहू निधी ज्या यंत्रणेमार्फत खर्च करण्यात योणार त्या कार्यक्रम प्रमुखास बंधनकारक राहील.

११. सदर प्रस्तावावरील निधीच्या विनियोगाच्या अनुषंगाने आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीच्या संदर्भात शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार सक्षम प्राधिकारी यांची प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

१२. सदर शासन निर्णय, प्रस्तुत शासननिर्णय वित्त विभाग परिपत्रक दिनांक ०५.१२.२०२३ व ०८.१२.२०२३ व तसेच सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दिनांक १२.०३.२०२४ मधील तरतूदींच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे..

१३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०५१४४०५१८८१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA VITTHAL KUDALE

Digitally signed by RAJENDRA VITTHAL KUDALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=b512f7ff8b758d60a4598c24a36386a4805881cbcea84410a43526338ca5896f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=92FCD41179A2BA99BFFA75CBE0C90685A327C8ACC0593DB3D1CCAD3F24BA6315, cn=RAJENDRA VITTHAL KUDALE
Date: 2024.03.15 16:21:13 +05'30'

**(राजेंद्र वि. कुडले)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त (आरोग्य सेवा) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे .
५. सहाय्यक संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे
६. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग(अर्थसंकल्प/विघयो), मंत्रालय, मुंबई.
१०. वित्त विभाग (व्यय-१४/ अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
११.कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग .
१२.निवडनस्ती (आरोग्य-७) .